मुंबई शहर व उपनगरे क्षेत्रात विशेषत्वाने झोपडपटटी भागात नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये म्हाडा प्राधिकरणास सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**

शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१४/प्र.क्र.६७/झोपनि-२
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई
तारीखः २८ ऑगस्ट,२०१४

**वाचा - १. शासन समक्रमांकाचा दि.८ ऑगस्ट,२०१४ चा शासन निर्णय.**
**२. शासन समक्रमांकाचा दि.२२ ऑगस्ट,२०१४ चा शासन निर्णय.**
**३. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ यांचे दि.२७.८.२०१४ व दि. २८.०८.२०१४ ची पत्रे.**

**शासन निर्णय** -

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, मुंबई शहर व उपनगर जिल्हयातील विशेषत्वाने झोपडपटटी भागात नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षामध्ये रू.१२६ कोटी इतका निधी संदर्भ क्र.१ अन्वये, म्हाड अधिनियम,१९७६ च्या कलम २८ (१) (a) (ii) व कलम २८ (१) (a) (iii) मध्ये नमूद केलेल्या प्रयोजनार्थ ( १ ) मुंबई झोपडपटटी सुधार मंडळ ( २ ) मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ व (३) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ अशा म्हाडा प्राधिकरणास योग्य वाटतील अशा मुंबई येथे कार्यरत घटक मंडळाच्या माध्यमातून मुंबई शहर व उपनगर जिल्हयात विशेषत्वाने झोपडपट्टी भागातील नागरी सुविधांची लोकोपयोगी मुलभूत व पायाभूत सोयी सुविधांची कामे करुन घेण्याच्या प्रयोजनार्थ त्यातील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात आली आहे.

२ उपरोक्त आदेशांच्या अनुषंगाने यापूर्वी म्हाडाकडून ३० मतदारसंघातील कामांच्या यादीसह प्रशासकीय मान्यतेचे आदेश शासनास प्राप्त झाल्यावर त्यासाठी रू.६० कोटी प्रत्यक्ष वितरणाचे आदेश संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तद्नंतर आता संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील अटीनुसार म्हाडाने प्रशासकीय मान्यतेसह रु. २१ कोटी इतक्या रकमेच्या कामांची यादी शासनास संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये सादर केली आहे व त्यानुसार निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे.

३. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रू.१२६ कोटी इतक्या निधीमधून, म्हाडाने केलेल्या मागणीनुसार व म्हाडा ने प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामाकरिता आवश्यक असलेला रू.२१ कोटी इतका निधी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. मुंबई शहर व उपनगरे क्षेत्रात विशेषत्वाने झोपडपटटी भागात नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये म्हाडा प्राधिकरण यांना सहाय्यक अनुदान देणे या प्रित्यर्थ होणारा खर्च" २२१६-गृहनिर्माण, ८०-सर्वसाधारण, १०३,गृहनिर्माण मंडळे, महामंडळे इत्यादींना सहाय्य-पंचवार्षिक योजनेंतर्गंत योजना (०१) (०४) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास सहाय्यक अनुदाने (२२१६ ०८९५) ३१ सहाय्यक अनुदाने, गृहनिर्माण योजना (पायाभूत सुविधा)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो चालू वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४४४/व्यय-३, दि.८.८.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०१२०७४५५३०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manohar Ramchandra Parkar

Digitally signed by Manohar Ramchandra Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Ramchandra Parkar
Date: 2014.08.30 12:03:30 +05'30'

**म.रा.पारकर**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माणभवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माणभवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
३. निवासी लेखा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
४. महालेखापाल ( लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०.
५. महालेखापाल ( लेखापरीक्षा व लेखाअनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
६. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधारमंडळ,गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
७. सह सचिव,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. सह सचिव, नियोजन विभाग, कार्या-१४७२, मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव ,वित्तविभाग, अर्थोपाय/व्यय-३/अर्थ-१७ कार्यासन, मंत्रालय, मुंबई
१०. उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१२. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
१३. आहरण व संवितरण अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. कक्ष अधिकारी (अर्थसं-१) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. निवडनस्ती, कार्यासन झोपनि-२.